**मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना दि. महाराष्ट्र स्टेट को-ऑप. हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशनने दिलेल्या कर्जाच्या शासन हमी परताव्याची रक्कम अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सगृनि-३७१३/प्र.क्र.६०/का.-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: ११ फेब्रुवारी, २०१५.

वाचा:- १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.-बीसीएच-२००८/प्र.क्र.१९७ (भाग-२)/मावक-२(अजाक-१), दि. ९/१/२०१३.

२) शासन निर्णय समक्रमांक दि. ५/३/२०१४ व शुध्दीपत्रक दि. १९/३/२०१४.

३) शासन निर्णय समक्रमांक दि. ३०/८/२०१४.

**प्रस्तावना :-**

मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत कर्ज दिलेल्या २४८ मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांपैकी अनुसूचित जमातीचे (आदिवासी) सदस्य असलेल्या ११ संस्थांना दिलेल्या कर्ज व त्यावरील व्याज मिळून रु. १३५.०० लक्ष दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि., मुंबई यांना अदा करावयाचे आहेत. त्यापैकी उपरोक्त क्र. २ वरील शासन निर्णयान्वये रु. १०८.०० लक्ष व क्र. ३ वरील शासन निर्णयान्वये रु. १६.२० लक्ष असे एकूण रु. १२४.२० लक्ष अदा करण्यात आले असून उर्वरित रु. १०.८० लक्ष दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि., मुंबई यांना अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत कर्ज दिलेल्या २४८ मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांपैकी अनुसूचित जमातीचे (आदिवासी) सदस्य असलेल्या ११ संस्थांचे कर्ज व त्यावरील व्याज अशी शासन हमी परताव्याची उर्वरित रक्कम रु. १०.८० लक्ष अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक- टी-७, ६२१६ गृहनिर्माणासाठी कर्जे,**

**८०, सर्वसाधारण ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना**

(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना

(०१)(०१) सहकारी गृहनिर्माण संस्थांना दिलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी शासन हमी

(६२१६ ०२४८) **रु. ४.४८ लक्ष (अक्षरी रुपये चार लक्ष अठ्ठेचाळीस हजार मात्र)**

(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना

(०२)(०१) सहकारी गृहनिर्माण संस्थांना दिलेल्या कर्जाच्या परताव्याबाबत शासन हमी.

(६२१६ ०२५७) **रु. ६.३२ लक्ष (अक्षरी रुपये सहा लक्ष बत्तीस हजार मात्र)**

३. प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रक्कम अदा करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांस देण्यात येत आहेत. उपरोक्त रक्कम रु. १०,८०,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष ऐंशी हजार मात्र) इतकी रक्कम कोषागारातून काढून ती दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि., मुंबई यांना त्वरीत अदा करावी.

४. सदर निधी खर्च करतांना शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले सर्व वित्तीय नियम, नियमावली, शासन आदेश, शासन निर्णय व CVC मार्गदर्शक सूचना इत्यादींचे अनुपालन करावे त्याचप्रमाणे महालेखापालांचे आक्षेप येणार नाहीत याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५/व्यय-१४, दि. १५/१/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०२१११२५९०३६५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar J Deshpande

Digitally signed by Chandrashekhar J Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrashekhar J Deshpande
Date: 2015.02.18 16:55:09 +05'30'

**(चं.ज.देशपांडे)**

शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) व्यवस्थापकीय संचालक, दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
५) आयुक्त, सहकार व निबंधक व सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
१०) संचालक, लेखापरीक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
११) कक्ष अधिकारी (कार्या-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.